**गटपातळीवरील ग्रामीण कारागिरांच्या (बलुतेदार) बहुउद्देशिय सहकारी संस्थांकरिता महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (वेतनेतर व वेतने) मंजूर करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्र.खाग्रामं-१५१०/प्र.क्र.२६१/९-स,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ५ ऑगस्ट,२०११.

वाचा :-१. महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.कार्यासन-८/लेखा/४७२३, दि.१७ सप्टेंबर, २०१०
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.औद्यो/सी-१/मराखाग्रामं/२०१०/२५६, दि.२१.१०.२०१०.
३. शासन निर्णय क्र.खाग्रामं-१५१०/प्र.क्र.२६१/९-स, दि.२३.०२.२०११
४. शासन निर्णय क्र.खाग्रामं-१५१०/प्र.क्र.२६१/९-स, दि.१६.०५.२०११

## प्रस्तावना :-

गटपातळीवरील ग्रामीण कारागिरांच्या (बलुतेदार) बहुउद्देशिय सहकारी संस्थांकरीता (रोजगार हमी योजना) सहकार विभागामार्फत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागास महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळाकरीता ४८८ तांत्रिक व ५६ अतांत्रिक अशी एकूण ५४४ पदे उपलब्ध करण्यात आलेली आहेत. या पदांच्या वेतन व भत्यांकरीता खादी ग्रामोद्योग मंडळास सहकार विभागामार्फत सहाय्यक अनुदान {वेतनेतर व वेतने} मंजूर करण्यात येते. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक २७, नियम १४९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन सदरचे सहाय्यक अनुदान (वेतनेतर व वेतने) मंजूर करण्याचे संपूर्ण अधिकार **प्रशासनिक विभाग** म्हणून **विभागीय सचिव** यांना आहेत. सदरचे अधिकार विभागांच्या संबंधित उप सचिव / सह सचिव यांना पुन:प्रदान करण्याची तरतूद विचारात घेता गटपातळीवरील ग्रामीण कारागिरांच्या (बलुतेदार) बहुउद्देशिय सहकारी संस्थांकरीता (रोजगार हमी योजना) नियुक्त करण्यात आलेल्या अधिकारी / कर्मचारी यांना सहाय्यक अनुदाने (वेतनेतर व वेतने) मंजूर करण्याचे अधिकार संबंधित पदसिद्ध उप सचिव / सह सचिव यांना प्रदान करण्याचा प्रस्ताव विभागाच्या विचाराधिन होता. याबाबतीत आता खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

## शासन निर्णय :-

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक २७, नियम १४९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन गटपातळीवरील ग्रामीण कारागिरांच्या (बलुतेदार) बहुउद्देशिय सहकारी संस्थांकरीता (रोजगार हमी योजना) नियुक्त करण्यात आलेल्या अधिकारी / कर्मचारी यांना सहाय्यक अनुदाने (वेतनेतर व वेतने) मंजूर करण्याचे अधिकार श्री. रा.स.अटक, उपसचिव यांना पुन:प्रदान करण्यात येत आहेत.

**२.** संबंधित उप सचिव यांनी सदरचे सहाय्यक अनुदान (वेतनेतर व वेतने) महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना मंजूर करताना वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ मधील तरतुदींचे पालन करावे.

**३.** महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांनी या योजनेखाली सहाय्यक अनुदान (वेतनेतर व वेतने) दरवर्षी मंजूर करण्याचे प्रस्ताव सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या शिफारशीन्वये शासनास सादर करावेत.

**४.** सदरहू योजनेतंर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च होणार नाही, याची काळजी महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळाने घ्यावी. अपवादात्मक परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा सदरचा खर्च जादा झाल्यास तो त्या-त्या वर्षीच नियमानुकूल करण्यात यावा.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०११०८०५१६५८३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( डॉ. सुधीरकुमार गोयल )
शासनाचे प्रधान सचिव.

प्रति :-

०१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
०२. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
०३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
०४. महालेखापाल(लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
०५. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय, मुंबई-४०० ०२१.
०६. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
०७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
०८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे **(१०-प्रती).**
०९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ, १९/२१, मनोहरदास मार्ग, फोर्ट, मुंबई-४०० ००१ **(१०-प्रती).**
१०. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, मुंबई शहर-१, मल्होत्रा हाऊस, जी.पी.ओ. समोर, फोर्ट, मुंबई--४०० ००१
११. कक्ष अधिकारी (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. कक्ष अधिकारी (व्यय-२), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. कक्ष अधिकारी (सा.उ.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१४. कक्ष अधिकारी (उद्योग-६), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५. कक्ष अधिकारी (५-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६. कक्ष अधिकारी (१२-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. कक्ष अधिकारी (१६-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. कक्ष अधिकारी (१७-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. निवड नस्ती / ९-स.